**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः असब-१२१८/प्र.क्र.३८/का.१४**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०८ जुन, २०१८

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४(१), ४(२) व ४(३) अनुसार खालील मंत्रालयीन संवर्गातील अ.क्र.१ ते ४ येथे नमुद केलेल्या व कलम ४(४) व ४(५) अनुसार अ.क्र.५ ते ७ येथे नमूद केलेल्या अवर सचिवांच्या बदल्या करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अवर सचिवांचे नाव | सध्याचा विभाग | बदलीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.सु.ए.आंधळे | सामान्य प्रशासन विभाग | कृषी व पदुम विभाग |
| २ | श्री.वि.म.राजूरकर | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | जलसंपदा विभाग |
| ३ | श्री.नि.अ.पांढरकामे | आदिवासी विकास विभाग | उच्च व तंत्र शिक्षण विभाग |
| ४ | श्री.सं.मु.भांडारकर | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | नियोजन विभाग |
| ५ | श्री.सु.रा.चव्हाण | विधी व न्याय विभाग | जलसंपदा विभाग |
| ६ | श्रीमती म.यु.कामटे | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | विधी व न्याय विभाग |
| ७ | श्री.अशोक प्र. अहिरे | सार्वजनिक आरोग्य विभाग | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तत्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता सर्व संबंधित विभागांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

(१) बदली झालेल्या अधिकाऱ्यांच्या संबंधित विभागाने पर्यायी अधिकारी हजर होण्याची प्रतिक्षा न करता त्या विभागातील अधिकाऱ्यांना तत्काळ कार्यमुक्त करावे.

(२) बदली झालेले अधिकारी बदलीच्या आदेशानुसार अन्य विभागातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी विभागात आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ मंजूर करण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्याला जबाबदार धरण्यात येईल.

(३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

(४) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे माहे जून, २०१८ पासुनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या विभागाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या विभागात हजर झाल्यानंतर बदलीनंतरच्या विभागाने काढावे व तसा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

३. विभागाने बदली झालेल्या अवर सचिव अधिकाऱ्यांना तत्काळ कार्यमुक्त न केल्यास शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१६/का.१४, दिनांक २३ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार, सामान्य प्रशासन विभागाकडून एकतर्फी कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार, बदलीनंतरच्या प्रशिक्षणाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्रमांक: कअनि १११६/प्र.क्र.३२/१४-ब, दिनांक २३.०५.२०१६ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार, विभागात बदलीने रुजू झालेल्या अवर सचिव अधिकाऱ्यांना बदलीनंतरचे प्रशिक्षण संबंधित मंत्रालयीन विभागांनी आयोजित करावे.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यावर पदस्थापना दिलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे.

६. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१८०६०८१८५२०५७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.06.08 18:55:06 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

अवर सचिव महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,
४. अ.मु.स./प्र.स./सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग,
५. सह/उप सचिव(आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग, — संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत
६. संबंधित अधिकारी, विभागामार्फत,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
८. आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
९. निवडनस्ती-कार्या.१४.